# परमार्थमंदिर

संकलनकार


गुरुदेव रा. द. रानडे



संपादक

प्रा. नरहर गणेश दामले, एम्. ए.

वामन त्र्यंबक आपटे, एम्. ए, एलएल. बी.

# परमार्थ मंदिर

संकलनकार

गुरुदेव रा. द. रानडे

संपादक

प्रा. नरहर गणेश दामले, एम्. ए.

वामन त्र्यंबक आपटे, एम्. ए.; एल्.एल्.बी.

# अनुक्रमणिका

# परमार्थ मंदिर

## अर्पणपत्रिका

नरवृंदवेंब काननदल्लि ।
श्रीहरिनामवेंबंथ कल्पवृक्ष हुट्टितय्या ।
नेरळु सेरलुंटु, फलवु मेललुंटु ।
ओरेव नालिगे रुचिगे नाममंत्रगळुंटु ।
इदे मुनिजनर मनद कोनेय ठावो ।
इदे ब्रह्मादिगळ सदमल हृदयपीठ ।
इदे द्वारावति इदे क्षीरांबुधि ।
इदे पुरंदरविठ्ठलन वैकुंठमंदिर ।।

गुरुदेव रामभाऊ रानडे यांच्या

पु ण्य स्मृ ती स

सादर समर्पण

# निवेदन

भगवंताच्या कृपेनें व गुरुदेवांच्या आशीर्वादानें 'परमार्थमंदिर' हा ग्रंथ हातावेगळा करतांना आम्हांला मनःपूर्वक आनंद वाटत आहे. वस्तुतः हा ग्रंथ यापूर्वींच प्रकाशित व्हावयास पाहिजे होता; कारण या ग्रंथाचें कच्चें हस्त-लिखित गुरुदेव रानडे यांच्या इच्छेला अनुसरून त्यांच्या हयातीतच आम्हीं तयार केलें होतें व तें त्यांना त्यांच्या पुणें येथील शेवटच्या भेटींत दाख-वितांच त्यांना अतिशय आनंद होऊन या ग्रंथाला त्यांनी आपला शुभाशीर्वादहि दिला होता व 'पुढें चला' असे उद्‌गार काढले होते. पण पुढें अवघ्या दोन महिन्यांच्या अवधींतच त्यांचें निर्याण झाल्यानें निरुत्साह निर्माण होऊन व इतर कांहीं अपरिहार्य कारणांमुळें हा ग्रंथ प्रकाशित करण्याचें कार्य जें मंदावलें तें इतकें कीं पुढें तीनचार वर्षें तें अंगावर घेण्यास जमलेंच नाही. तथापि गुरुदेवांच्या आदेशानुसार हातीं घेतलेलें कार्य किती काळ अपुरें ठेवावयाचें हीहि रुखरूख मनाला लागली व त्यामुळें या कार्याला आम्ही पुनश्च नेटानें सुरवात केली व अशा रीतीनें हें प्रकाशनाचें काम बऱ्याच विलंबानें कां होईना, पुरें होण्याचा सुयोग प्राप्त झाला हें पाहून मनाला आनंद वाटणें साहजिकच होय.

गुरुदेव रानडे हे ज्या निंबरगी संप्रदायांतील एक थोर अधिकारी पुरुष होते त्या संप्रदायाच्या पारमार्थिक व तात्त्विक शिकवणीचे सारभूत असलेल्या भारतांतील आत्मानुभवी साधुसंताच्या हिंदी, मराठी, कानडी, व संस्कृत भाषांतील निवडक अशा पांचशे पदांचा संग्रह म्हणजे हा 'परमार्थ-मंदिर' ग्रंथ होय. या पदांचें संकलन गुरुदेवांनींच आपल्या संप्रदायाचा विशिष्ट नैतिक व आध्यात्मिक दृष्टिकोन डोळ्यांपुढें ठेवूनच केलें होतें. यांपैकीं सुमारें चारशें पदें पूर्वींच वेगवेगळीं प्रसिद्धही झालेलीं होतीं. व त्यांतच त्यांनीं पुढें आणखी शंभर अनुभविक पदांचीं भर घालून ही संख्या पांचशे केली. पांचशे पदें एकत्र ग्रंथरूपाने प्रसिद्ध व्हावी अशी त्यांची उत्कट इच्छा होती. ती त्यांची इच्छा पुरी करण्याचा आमचा मानस

त्यांना कळवितांच त्यांना अतिशय आनंद वाटला व तें कार्य त्वरेनें करण्यास त्यांनीं आम्हांस प्रोत्साहनही दिलें. या ग्रंथाचें त्यांना अनेक दृष्टींनीं महत्त्व वाटत होतें. एक तर या पदांपैकीं कांहीं पदें त्यांचे परमगुरु निंबरगी महाराज हे वारंवार म्हणवून घेत असत. तसेंच या पदांपैकीं बरीचशीं पदें त्यांचे सद्‌गुरु श्री भाऊसाहेब महाराज यांनी स्वतः 'ऐकलेलीं व पाहिलेलीं' होतीं. त्यामुळें या पदांचें महत्त्व व पावित्र्य गुरुदेवांच्या दृष्टीनें विशेषच होतें. त्यांचे गुरुबंधु श्री अंबुराव महाराज हेही हीं पदें वारंवार म्हणवून घेत असत. पण याहीपेक्षा आणखी एक विशेष महत्त्वाचें कारण म्हणजे गुरुदेव हे एकदा ध्यानमग्न स्थितींत असतांना त्यांना कांहीं पारमार्थिक पदांचे तंबोऱ्यावर सुस्वर गायन ऐकू आलें, त्यामुळे त्यांनीं अनुभवपदांची निवड करण्याचें निश्चित करून या ग्रंथांतील पदें निवडलीं आहेत. आपल्या संप्रदायाच्या पारमार्थिक शिकवणीचें यथार्थ स्वरूप समजून येण्यास या पदांचा बहुमोल उपयोग होईल हीही एक दृष्टि या ग्रंथांतील पदांची निवड करतांना त्यांनीं आपल्या डोळ्यांपुढे ठेवली होती. स्वतः त्यांनींही आपल्या ग्रंथामध्यें या पदांचा भरपूर आधार घेतला एवढेंच नव्हे तर त्या पदांचें अधिकारवाणीनें विवेचन करून त्यावर महत्त्वपूर्ण प्रकाशही पाडलेला आहे.

या ग्रंथाचा आणखी एक विशेष म्हणजे या ग्रंथाचें नामकरणही गुरुदेवांनीं स्वतःच केलें होतें. एक दिवस निंवाळ येथील ध्यानमंदिरांत दुपारच्या भजनाचा व पोथीचा कार्यक्रम चालू असतां सुप्रसिद्ध कानडी संत पुरंदरदास यांचें या ग्रंथाच्या अर्पण-पत्रिकेंत छापलेलें पद म्हणण्यांत आलें. त्या पदाचे शेवटचे दोन चरण '**इदे द्वारावति, इदे क्षीरांबुधि । इदे पुरंदर विठ्ठलन वैकुंठ मंदिर**' असे आहेत. ते ऐकतांच गुरुदेव आनंदित होऊन एकदम त्यांच्या तोंडून स्वयंस्फूर्तीनें उद्‌गार बाहेर पडले की 'बस, बस, बस. आपल्या ग्रंथाचें नांव 'परमार्थ-मंदिर' ठेवावयाचें. पुरंदर विठ्ठलाचे वैकुंठमंदिर तसेंच आपलें परमार्थ-मंदिर. आपलीं पांचशे पदें म्हणजे या परमार्थमंदिराचे पांचशे खांबच होत. 'परमार्थ सोपाना'नंतर 'परमार्थमंदिरा' ची रचना व्हावयासच हवी.'

सारांश, या ग्रंथांतील पदाचें संकलन व ग्रंथाचें नामकरणही गुरुदेवांनीं केलेलें असल्याने या ग्रंथाचें सर्व कर्तृत्व परमार्थतः त्यांचेंच आहे व त्या

दृष्टीनें तेच या ग्रंथाचे संकलनकार होत. आमच्याकडे फक्त संपादकाचें व प्रकाशकाचें कार्य उरलें होतें व तें आम्हीं यथामति पुरें केलें आहे. या ग्रंथाचें सर्व श्रेय त्यांचेंच असल्यानें 'गंगेचें पाणी गंगेसच अर्पण' या न्यायानें आम्हीं त्यांचाच हा ग्रंथ त्यांचे चरणीं विनम्र भावाने अर्पण केला आहे.

या पांचशे पदांबरोबरच, आमच्या संप्रदायांतील संतश्रेष्ठ श्री सद्‌गुरु निंबरगी महाराज यांनीं केलेलीं १३ पदें तसेंच त्यांच्या समाधीचें छायाचित्र, सद्‌गुरु भाऊसाहेब उमदीकर महाराज, सद्‌गुरु अंबुराव महाराज व गुरुदेव रानडे यांचीं छायाचित्रें व त्यालगत या सर्वांचीं बोधवचनें घालण्यांत आलीं आहेत व भाऊसाहेब उमदीकर महाराज यांचीं आणखी कांहीं बोधवचनें स्वतंत्रपणें दिलीं आहेत. त्याबरोबरच संप्रदायांतील कांहीं भूपाळ्या आरत्या, व प्रार्थना यांचाही या ग्रंथांत समावेश करण्यांत आला आहे. हा ग्रंथ पुरा होण्यापूर्वींच गुरुदेवांचें निर्याण झाल्याने त्यांच्यावरील दोन आरत्या या ग्रंथांत घालणें आम्हांस भाग पडलें आहे.

या ग्रंथाची मुद्रणयोग्य अशी हस्तलिखित प्रत तयार करणें, त्यांतील पदांना राग व ताल देऊन तीं गेय करणें व ग्रंथांतील कवींची व त्यांच्या पदांची सूचि तयार करणें इत्यादि कष्टाचीं कामें अतिशय परिश्रमपूर्वक व मोठ्या काळजीने व आत्मीयतेने, गुरुदेवांचे एक निष्ठावंत भक्त व आमचे सन्मित्र श्री. प्रल्हादराव कुलकर्णी व चिदंबरराव देशपांडे बंगलोर यांनीं केल्या-बद्दल त्यांना जितके धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. आपल्या नांवाचा उल्लेखही करूं नये असे त्यांनीं आम्हांस कळविलें होतें. तथापि त्यांचीं नांवें अप्रकाशित ठेवणें हें आम्हांला उचित न वाटल्यानें, त्यांच्या विनंतीकडे कानाडोळा करून आम्हीं आमचें कर्तव्य म्हणून त्याचे हृत्पूर्वक प्रकट आभार मानले आहेत.

जमखंडी ही गुरुदेवांची जन्मभूमि व सद्‌गुरूंकडून अनुग्रहप्राप्तीचीही भूमि; त्याचप्रमाणें त्यांचे सद्‌गुरु श्रीभाऊसाहेब उमदीकर महाराज यांच्या परमार्थाचें माहेर. १९५६ सालीं जमखंडीच्या नागरिकांनीं गुरुदेव सत्कार समितीच्या द्वारां गुरुदेवांच्या सत्तरीचा अत्यंत थाटानें साजरा केलेला अमृतमहोत्सव-समारंभ ज्यांनी पाहिला असेल त्यांना जमखंडीचे व गुरुदेवांचे किती आत्मीयतेचे संबंध होते हें दिसून आल्याशिवाय राहिलें

नसेल. त्यांच्या निर्याणानंतर त्यांच्याच पूर्वीच्या राहत्या घरीं त्यांच्या पुण्य-स्मृतीनिमित्त जमखंडीच्या त्यांच्या भक्तमंडळींनी 'श्री गुरुदेव परमार्थ मंदिर' स्थापन केलें आहे. या परमार्थ मंदिरातर्फे हा 'परमार्थ-मंदिर' ग्रंथ प्रकाशित होणें हाही एक अपूर्व सुयोगच होय असें म्हणावयास हरकत नाही.

या ग्रंथाच्या मुद्रणाचें काम अत्यंत आपुलकीनें, त्वरित व उत्कृष्ट करून दिल्यावद्दल यशवंत मुद्रणालयाचे चालक व आमचे स्नेही श्री. शंकर रामचंद्र तथा मामाराव दाते यांचे आम्ही अत्यंत आभारी आहों. तसेंच ग्रंथप्रकाशनाचे कामीं ज्या ज्या आमच्या साधक बंधूंनीं व विशेपतः मुंबईचे श्री. वाय. पी. पंडित यांनीं जी सक्रिय सहानुभूति दाखविली व वेळोवेळीं उपयुक्त सूचना दिल्या त्यावद्दल त्यांचेही आम्ही फार ऋणी आहों.

या ग्रंथांतील पदांची मांडणी गुरुदेवांच्या इच्छेप्रमाणें पदांच्या आद्याक्षरांनुसार केली आहे.

ग्रंथात मुद्रणदोप राहू नयेत म्हणून शक्य तों दक्षता घेतली आहे. तथापि ग्रंथ अगदी अल्पावधींत छापणें भाग पडल्यानें कांहीं अशुद्धें राहिलीं असल्यास त्यावद्दल वाचकांनीं क्षमा करावी.

हीं आमची अल्पस्वल्प सेवा सद्‌गुरुचरणीं नम्रपणें आम्ही समर्पण करितों.

'सूर्योदय' पुणें ४
रामनवमी शक १८८५
दि. २।४।१९६३

न. ग. दामले
वा. त्र्यं. आपटे

# प्रस्तावना

**जेणें परमार्थ वोळखिला । तेणें जन्म सार्थक केला ॥**

वैदिक काळापासून आजपावेतो ज्या थोर साधुसंतांनीं स्वतः परमार्थमार्ग चोखाळून आत्मलाभ करून घेतला व साधकांना योग्य मार्गदर्शन करून उपकृत केलें त्यांच्या मालिकेंत सिद्धगिरीचे श्रीकाडसिद्ध, निंबरगीचे श्रीगुरुलिंगजंगममहाराज(शके १७१२ ते शके १८०७ चैत्र शु. १२/१३),उमदीचे श्रीभाऊसाहेब महाराज(शके १७६५ रामनवमी ते शके १८३५ माघ शु. ३). इंचगेरीचे श्रीअंबुराव महाराज (शके १७७९ ते १८५५ पौष शु. ६) व निंबाळचे गुरुदेव रामभाऊ(सन ३–७–१८८६ ते ६–६–१९५७) यांना स्थान लाभलेलें आहे. श्रीकाडसिद्ध यांच्यासंबंधीं ऐतिहासिक दृष्टचा विश्वसनीय अशी फार थोडी माहिती उपलब्ध आहे. ते नाथ संप्रदायांतील एक थोर सत्पुरुष असून, त्यांचें स्थान कोल्हापूरनजीक सिद्धगिरि नांवाच्या डोंगरावर आहे. त्यांनीं निंबरगी येथील श्रीनारायणराव (श्रीगुरुलिंगजंगममहाराज) यांच्यावर, दूरदृष्टीनें त्यांची योग्यता जाणून, अनुग्रह केला. श्रीनिंबरगी महाराजांनी सतत ३६ वर्षें उत्कट भावानें, अविश्रांत साधन केलें. गुरुकृपेनें व साधनबलानें त्यांनीं आत्मज्ञानांत पारंगत होऊन परमार्थाचें शिखर गांठलें व सिद्धावस्थेचा आनंद लुटला. पुढील २८ वर्षें म्हणजे वयाच्या ९५ वर्षापर्यंत गुर्वाज्ञेनें लोकोद्धाराचें काम केलें. त्यांचे एक प्रमुख शिष्य श्रीरघुनाथप्रिय, आपल्या उमदीच्या वास्तव्यांत, श्रीभाऊसाहेब महाराजांना, वयानें फार लहान असतांनाही भेटत असत. त्यांच्यामुळें, त्यांच्यामार्फत श्रीभाऊसाहेब महाराजांना श्रीनिंबरगी महाराजांच्याकडून अनुग्रह (नाम) मिळण्याचें भाग्य लाभलें. सद्‌गुरूवरील अचल निष्ठा, निरहंकार वृत्ति, प्रखर वैराग्य, दृढ निश्चय व खडतर साधन यांच्या जोरावर प्रपंचत्याग न करतां पण लौकिकाची चाड न बाळगतां व अतिशय शरीरकष्ट सोसून त्यांनीं परमार्थाचें ध्येय म्हणजे आत्मसाक्षात्कार याचा लाभ करून घेतला. आपलें हें साधन म्हणजे नामस्मरण त्यांनीं अत्यंत निग्रहानें व निष्ठेनें सुमारें २८ वर्षें दररोज

कमींत कमी ८ – १० तास अव्याहतपणें केलें. सद्गुरूंच्या निर्याणानंतर (१८८६) आपल्या साधनांत खंड पडू न देतां त्यांच्या आदेशानुसार तितकींच वर्षे गांवोगांवीं जाऊन 'सेवितो हा रस वांटितो आणिका' या उदार बुद्धीनें शुद्ध परमार्थाच्या प्रसाराचें काम केलें. हें करतांना त्यांनीं जातगोत, स्त्री, पुरुष, धर्म, पंथ, विद्या, वय, धन अशा प्रकारचा कोणताही भेदभाव मनांत आणला नाहीं. आलेल्या लोकांना त्यांचा भाव पाहून नाम देत. शिष्यांच्याकडून नामस्मरण व सद्वर्तन यांखेरीज कशाचीही अपेक्षा न करतां त्यांच्या अडचणी निवारण करून त्यांच्या कल्याणाची सदैव काळजी वाहात. सच्छिष्यांना सद्गुरूंचा हा केवढा आधार!

श्रीभाऊसाहेब महाराजांचे दोन श्रेष्ठ शिष्य म्हणजे श्रीअंबुरावमहाराज व गुरुदेव रामभाऊ हे होत. या दोघांनींही आपल्या सद्गुरूंच्या आज्ञेप्रमाणें आजन्म व कडकडीतपणें परधन, परस्त्री विषयक पथ्य सांभाळून वर्षानुवर्षें एकही दिवस वायां जाऊ न देतां पराकाष्ठेच्या निष्ठेनें, एकांतांत, बरेच दिवस खनाळांत जाऊन साधन केलें. अखंड नामस्मरणाचा ध्यास घेतला. परमार्थाचें रहस्य ओळखलें. स्वरूप-साक्षात्काराच्या आनंदाचा अनुभव घेतला. जीवन सार्थक केलें. 'शिष्यप्रबोधनीं समर्थ होऊन' त्यांनीं आपल्या सद्गुरूंच्या पावलावर पाऊल टाकून परमार्थ प्रसाराचें काम उत्कृष्टपणें पार पाडलें. शिष्यसमुदाय वाढला. त्यांनीं शिष्यांना सोपा, सरळ, सुरक्षित असा नामस्मरणाचा सन्मार्ग दाखवून दिला.

श्रीभाऊसाहेबांनीं इंचगेरी येथे इ. स. १९०३ सालीं मठाची स्थापना केली. मठाधिपति म्हणून श्रीअंबुरावांनीं शेवटपर्यंत म्हणजे ३० वर्षे मठाची अनन्यभावें, निरलसपणें, निःस्पृहतेनें सेवा केली. व श्रीभाऊसाहेबांच्या निर्याणानंतर सुमारें २० वर्षे भक्तीचा प्रसार केला. स्वतःचा परमार्थ वाढविला व साधकांच्या प्रगतीला मदत केली. इंचगेरी येथे वर्षानुवर्षें साजऱ्या होणाऱ्या नामसप्ताहामुळें अनेक साधकांचें कल्याण झालें. श्रीअंबुराव हे शिष्यांचे प्रिय 'बाबा' झाले.

गुरुदेव रामभाऊंच्यावर अनेक दुर्धर आपत्ति ओढवल्या. शारीरिक, कौटुंबिक व कांही काळ आर्थिक सुद्धां. त्या सर्वांतून ते तावून सुलाखून बाहेर पडले. त्यांची पारमार्थिक निष्ठा अभंग राहिली, अधिकच दृढमूल झाली.

अलाहाबाद विद्यापीठांतून इ. स. १९४६ सालीं सेवानिवृत्त झाल्यापासून त्यांनीं आपल्या निंबाळ येथील आश्रमांत कायमचें वास्तव्य केलें. तेव्हांपासून कर्नाटक, महाराष्ट्र व इतर प्रांतांतील लोकही मोठ्या संख्येनें त्यांची विद्वत्ता व पारमार्थिक योग्यता यांबद्दल आदर वाटून त्यांच्याकडे येत असत. ते जरी औपचारिक व्याख्यानें व प्रवचनें देत नसले तरी त्यांचें सहज बोलणें लोकांना हितोपदेशाचें वाटून त्यांच्या शंकांचें निरसन होऊन त्यांना योग्य मार्गदर्शन मिळत असे.

त्यांच्या शिष्यवर्गांत सर्वधर्मांच्या, सर्व जातींच्या, समाजांतील सर्व थरांतील श्रीमंत, गरीब, अशिक्षित, विद्वान् लोकांचा समावेश असे. अशा रीतीनें श्रीनिंबरगी महाराज, श्रीभाऊसाहेब महाराज व श्रीअंबुराव महाराज यांच्याकडून परंपरागत आलेल्या परमार्थाचा प्रसार त्यांच्याकडून शेवटचीं २४ वर्षें वाढत्या प्रमाणावर होत गेला. प्रा. रानडे गुरुदेव रामभाऊ झाले.

विशुद्ध परमार्थ प्रसाराचे कामीं गुरुदेवांनीं लिहिलेल्या ग्रंथांची (विशेषत: 'औपनिषदीय तत्त्वज्ञानाची विधायक समीक्षा' 'भगवद्गीता : ईश्वरसाक्षात्कारमीमांसा', तसेंच 'महाराष्ट्रीय, हिंदी, व कर्नाटकांतील संतांचा साक्षात्कारमार्ग' यांवरील तीन ग्रंथ) बहुमोल मदत झाली.

माझे सर्व ग्रंथ श्रीभाऊसाहेब महाराजांनीं दिलेली दृष्टि व त्यांच्या संगतींत जें 'ऐकिलें, पाहिलें, अनुभवास आलें' त्याचा परिपाक होय; माझें लेखन म्हणजे प्राचीन तत्त्वज्ञांची व संतांची, विशेषत: निंबरगी संप्रदायांत रूढ असलेल्या प्रस्तुत पुस्तकांतील ५०० पद्यांतून व्यक्त व सूचित केलेल्या सद्विचारांची, सद्भावनांची, परानुभूतीची आधुनिक पद्धतीनें गुंफून ईश्वरचरणीं अर्पण केलेली मालाच होय असें ते म्हणत. इतकें महत्त्व या परमार्थमंदिरांत संगृहीत केलेल्या पद्यांना ते देत असत. त्यांतील तत्त्वज्ञान, नीतिमीमांसा, सद्गुरूचीं लक्षणें, साधनचिकित्सा, नाममाहात्म्य, देवाभक्तांचा संबंध, राजयोग व भक्ति यांचें मीलन, विविध प्रकारच्या अनुभवांचें व आत्मसाक्षात्काराचें स्वरूप व त्यामुळें जीवनावर होणारा परिणाम या सर्वांचा सर्वसाधारण परिचय होण्याचे कामीं गुरुदेवांच्या पारमार्थिक शिकवणीचें विहंगमदृष्टीनें अवलोकन उपयुक्त ठरेल या बुद्धीनें या प्रस्तावनेंत त्यांच्या शिकवणीचें सार देण्याचा प्रयत्न केला आहे.

'लोकमान्य टिळकांनीं ज्याप्रमाणें गीतेचें तात्पर्य 'ज्ञानमूलक भक्तिप्रधान निष्काम कर्मयोग' असल्याचें एका सूत्रमय वाक्यांत सांगितलें आहे, तद्वतच गुरुदेवांच्या पारमार्थिक शिकवणीचें सार एका सूत्रांत सांगावयाचें झाल्यास तें 'विवेक (ज्ञान) मूलक, नीतिप्रधान, आत्मसाक्षात्कारपर्यवसायी नामस्मरणात्मक भक्तियोग' आहे असें मी त्याचें वर्णन करीन. याचा उगम त्यांच्या गुरुपरंपरागत शिकवणींत आढळून येतो. त्यांची गुरुपरंपरा सिद्धगिरीचे श्रीकाडसिद्धेश्वर, श्रीनिंबरगीमहाराज व उमदीचे श्री भाऊसाहेब महाराज व श्रीअंबुराव महाराज अशा आत्मानुभवी संतश्रेष्ठांची होती. आत्मसाक्षात्कार हें ध्येय व नामस्मरण हा मार्ग हें या पंथाचें वैशिष्टय असू त्यांत गीतेंत सांगितलेला राजयोग व भक्तियोग यांचें सुंदर मीलन झालेलें आढळून येतें. हीच शिकवण गुरुदेवांनीं अधिक विस्तारानें व आधुनिक तत्त्वज्ञानाच्या परिभाषेंत लोकांना विशद करून सांगितली.

## ज्ञानमूलक, नीतिप्रधान अनन्य भक्ति

भक्तियोग हा जरी त्यांच्या तत्त्वज्ञानाचा गाभा असला तरी त्या भक्तियोगाला त्यांनीं अंधश्रद्धेचा, भोळसटपणाचा स्पर्शहि होऊं न देण्याची दक्षता घेतली. त्यांचा भक्तियोग सम्यक् विवेकज्ञानावर आधारला होता. सत्-असत्, नित्य-अनित्य, सार-असार यांचा निर्णय करणारी बुद्धि म्हणजेच विवेक होय. व्यावहारिक कर्तव्येंही पारमार्थिक दृष्टीने कशीं करावीं हें या विवेकामुळें आपणांस समजतें. ज्ञानाच्या म्हणजे शास्त्रीय ज्ञानाच्या व तत्त्वज्ञानाच्या निकषावर पारमार्थिक श्रद्धा व अनुभव यांचें महत्त्व व खरेपण तपासून घेण्याच्या कामीं या विवेकाचा उपयोग होतो.

विवेकज्ञानाइतकेंच किंबहुना थोडेसें अधिकच महत्त्व नीतीला आहे. विवेकज्ञानामुळें विचारांतील गोंधळ व अस्पष्टता नाहींशी होते, तर नीतीमुळे चित्तशुद्धि होऊन अंतःकरण पवित्र होतें. ही चित्तशुद्धि होण्याचीं प्रमुख साधनें म्हणजे दुर्गुणांचा त्याग व सद्‌गुणांचें संवर्धन हीं होत. दुर्गुणांच्या कक्षेंत कामक्रोधादि षड्रिपूंचाच तेवढा समावेश होत नसून परमार्थ साधनाच्या आड येणाऱ्या निद्रा, आळस, चिंता, लज्जा इत्यादिकांच्या आहारीं न जातां, अंगीं वैराग्य बाणण्याचा साधकानें निर्धारानें प्रयत्न केला पाहिजे.

शिरसंगीचे वलभीम योगी यांनीं एका कानडी पदांत म्हटल्याप्रमाणें आपलें शरीर हें नवछिद्रांचें वारूळ असून त्यांत विषयवासनांचा सर्प यांपैकी कोणत्या द्वारानें चोरून प्रवेश करील याचा नेम नसतो व तो एकदां शिरला कीं, परमार्थाची हानि झालीच म्हणून समजावें. त्याच्या उलट जर या वारुळांत 'गोरलि'(वलभीम महायोगी)अगर 'विंदुलें' (ज्ञानेश्वरमहाराज) अथवा (गुरुदेवांचा शब्द वापरावयाचा तर) Spiriton शिरलें व स्थिरपद झालें की, तें विषयवासनेच्या सर्पाला वारुळातून हाकलून लावतें. तेव्हां या पदांत सांगितल्याप्रमाणें साधकानें या परमार्थविघातक विषयवासनांचा मनावर पगडा वसूं न देण्याची दक्षता घेतली पाहिजे. त्याचवरोबर साधकानें शम-दम, समता-सहिष्णुता, भूतदया-भगवद्भक्ति इत्यादि सद्गुणांची जोपासना व संवर्धन करण्याचा आटोकाट प्रयत्न केला पाहिजे.

गुरुदेवांच्या मतें भक्ति हा सर्व सद्गुणांचा राजा अगर मुकुटमणि असून भक्तीच्या मध्यबिंदूभोंवतीच इतर सर्व सद्गुण त्याच्या आश्रयानें वावरत असतात. ही भक्ति 'अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता' या नारदभक्तिसूत्रांत सांगितल्याप्रमाणें अगर श्रीवसवेश्वरांनीं 'चकोरंगे चंद्रमन वेळगिन चिंते' या शब्दांत वर्णन केल्याप्रमाणें अनन्य स्वरूपाची असली पाहिजे. आपलीं सर्व कर्में निरहंकारवुद्धीनें, फलासक्ति सोडून, सर्वभावानें ईश्वराला समर्पण करणें यांतच भक्तीचें (त्याचप्रमाणें नैष्कर्म्यसिद्धीचें सुद्धां) रहस्य सामावलेलें आहे.

## सबीज नामाचें अखंड स्मरण

विवेक, वैराग्य व भक्ति यांचें महत्त्व वर्णन केल्यावर भक्तीचें प्रमुख अंग असलेल्या नामस्मरणाचा आतां विचार करूं. नामाचें महत्त्व अनेक पौर्वात्य व पाश्चात्य साधुसंतांनीं प्रतिपादिलें आहे. तुळसीदासाचें नाम हें सगुण व निर्गुण यांमधील दुवा असून त्याचें 'उभयप्रवोधक, सुसाखी व दुभाखी' या शब्दांत वर्णन केलें आहे. ज्या नामाचें स्मरण करावयाचें तें सद्गुरूकडून म्हणजे आत्मानुभवी अधिकारी पुरुषांकडून मिळालें पाहिजे. सद्गुरूची महती ज्ञानेश्वरादि संतांनीं मुक्तकंठानें गाइली आहे. सद्गुरु हा ज्ञानाचा चित्सूर्य होय; तो शिष्याच्या डोळ्यांत ज्ञानांजन घालून त्याला

आत्मरूप दाखवितो असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें असून सद्‌गुरु हा सच्छिष्याचें तारु सुरक्षितपणें परतीरावर नेणारा 'केवटिया' म्हणजे कुशल नावाडी आहे असें मीराबाईंनीं म्हटलें आहे. अशा सद्‌गुरूंकडून मिळालेल्या 'सबीज' अगर 'दिव्य' नामाचा प्रभाव फार मोठा आहे. त्यांतील अलौकिक सामर्थ्यानें नामधारकास साक्षात्काराची फलप्राप्ति होऊं शकते. सद्‌गुरूकडून असें 'सबीज' नाम मिळालें तरी तेवढयानेंच फलप्राप्ति होत नाहीं. नामधारकाला एकविध भावानें नामस्मरणाचा सतत अभ्यास करावा लागतो व तो करीत असतांना कामिनी, कांचन यासंबंधीचें पथ्य फार कसोशीनें पाळण्याची आवश्यकता असते. हें नामस्मरण अगर ध्यान कसें करावयाचें हें गीतेच्या सहाव्या अध्यायांत व 'स तु दीर्घकालनैरंतर्यसत्कारासेवितो दृढभूमिः।' या पतंजलीच्या सूत्रांत सांगितलें आहे. त्यांतील मथितार्थ असा आहे कीं, साधकानें नामस्मरण 'एकांतस्थळीं, स्थिरसुख आसनावर वसून, नासिकाग्रदृष्टि ठेवून, एकाग्रचित्तानें व सर्वभावानें करावयाचें असून तेंही आमरण व अखंड करावयाचें आहे.' गुरुदेवांच्या संप्रदायांत आणखी एक वैशिष्टच सांगितलें आहे व तें म्हणजे हें नामस्मरण 'तोंड न उघडतां, जीभ न हालवतां आंतल्या आंत, म्हणजे वैखरी वाणीनें न करतां श्वासोच्छ्वासानें करावयाचें.' हें सांगण्याचा उद्देश असा कीं, श्वासांत नाम गुंफिल्यानें प्राण व भगवत्प्रेम यांचें सामरस्य होऊन नाम फलद्रूप होण्यास उत्तम मदत होते.

यावरोबरच साधकानें सत्संगतींत राहून साधन करावें. त्याला फार महत्त्व आहे. मधून मधून निष्ठावंत साधक एकत्र जमल्यानें त्यांच्या सद्विचारांना चालना मिळते. त्यांचा भक्तिभाव उद्दीपित होतो व त्यांचें साधनहि अधिक तत्परतेनें होण्याला मदत होते. असें जरी असलें तरी परमार्थाचा मार्ग हा प्रत्येकानें स्वतःच पावलापावलानें आक्रमावयाचा असतो. सीतादेवीनें बिभीषणाला सांगितल्याप्रमाणें 'परपायीं रघुपति। न भेटे निश्चिती कोणाही। हेंच खरें.

## आत्मानुभव : स्वरूप व कसोटी

अशा रीतीनें नामस्मरणाचा अभ्यास केल्यास साधकाला परमार्थप्राप्तीच्या मार्गांतील विविध प्रकारचे अनुभव येऊं लागतात. अशा प्रकारचे अनुभव

जगांतील वेगवेगळ्या देशांतील व कालांतील व भिन्नधर्मीय साधुसंतांना आले आहेत. ते व्यक्त करण्याची त्यांची भाषा, पद्धत व संकेत जरी भिन्न असले तरी ते वास्तविक एकरूपच असल्याचें दिसून येतें. हे अनुभव प्रकाश, रंग, रूप, नाद, रस इत्यादि स्वरूपाचे असतात. उदाहरणार्थ, चंद्रावाचून चांदणें व सूर्यावाचून तेज; रक्त, पीत, नील, कृष्ण; त्रिदु, मोतीं, शेष, विश्वतश्चक्षु, समचरण; घंटा, मेघ, भृंग, मुरली; अमृतरस इत्यादि. या ओघानेंच गु. रामभाऊंच्या बाबतींत कांही विशेष प्रसंगीं पाहावयास मिळणाऱ्या स्थितीचें चित्र मला खालील शब्दांत काढतां येण्याजोगें आहे. 'ज्या गुरुमाउलीच्या कृपेनें अनन्य भक्तांना 'मोत्यांच्या जलधारांनीं' स्नान घडलें, हळूहळू स्रवणारा 'अमृतरस' चाखण्याचें भाग्य लाधलें, 'रंगपंचमी' चा आल्हाददायक सोहळा पाहतां आला, 'मांडीवर खेळत' असतांना अगर 'हिंदोळ्यांतून झोके' खातांना 'अनाहत नादाच्या' स्वर्गीय संगीतानें मनाचा लय होऊन 'योगनिद्रे'चा अनुभव येऊन 'आत्मसाक्षात्कारा'च्या परमानंदाची सहज स्थिति प्राप्त झाली, त्या आत्मदेवरूपी गुरुमाउलीच्या स्मरणानें त्यांचें अंतःकरण सद्गदित होऊन, सर्व देह पुलकित व्हावा व कृतज्ञतेनें नयनांवाटे अश्रुधारा वाहाव्या व मुखांतून धन्योद्गार निघावे यांत आश्चर्य तें काय ?'

हे अनुभव अतींद्रिय, अंतःस्फूर्त, आंतबाहेर एक व सतत टिकणारे, तसेंच वाढता आनंद देणारे व साधुसंतांच्या अनुभवांशी जुळणारे, अथवा थोडक्यांत भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें 'प्रत्यक्षावगमं, सुसुखं, अव्ययं' असले तर त्याबद्दल संशय घेण्याचें कारण नाही. साधकानें वर उल्लेखिलेल्या कसोटीवर आपले अनुभव तपासून पाहावे व आपली खात्री करून घ्यावी. येथें अंधश्रद्धा अगर परप्रत्ययनेयबुद्धि कामाची नाहीं. खऱ्याखुऱ्या अनुभवांचें फार महत्त्व आहे. तरी पण आपल्या अनुभवांची 'आळकेपणें' वाच्यता न करण्याबद्दल समर्थ रामदासांनीं साधकांना सावधानतेचा इशारा दिला आहे. परिपक्व होईपर्यंत फळ पानाआड दडलेलें असावें. तसेंच साधकानेंहि परमार्थ पक्का अंगीं मुरेपर्यंत प्रकट न होण्याची खबरदारी घ्यावी. हे अनुभव म्हणजे परमार्थपथावरील 'निशाणें'च होत. त्यामुळे परमार्थावरील श्रद्धा दृढमूल होऊन परमार्थाचा 'उफराटा व बिकट पंथ' आक्रमण करण्याच्या कामीं

साधकांचा उल्हास व उत्साह वाढूं लागतो. 'पैल लाविलें निशाण ! ...... पांडुरंग भेटे भरंवशानें' या श्रीतुकाराममहाराजांच्या उक्तीप्रमाणें आत्म-देवदर्शन लवकरच होईल असा भरंवसा निर्माण होतो. उदाहरणार्थ म्हणून वर निर्देश केलेले अनुभव, त्यांत अचूक क्रम लावतां आला नाही तरी, साधकाला थोडयाफार फरकानें पायरी पायरीनेंच येतात. या संदर्भात 'अवतार' व 'तत्त्वमसि' यांचा अनुभवदृष्टया खालीलप्रमाणेंही अर्थ लावतां येण्याजोगा आहे. ज्या रूपांत त्याच्यापुढें देव 'अवतार' घेऊन उभा राहतो त्यावरून त्याला दिसणाऱ्या स्वरूपाच्या प्रमाणांत त्याची आध्यात्मिक प्रगति किती झाली हें दिसून येतें. एका दृष्टीनें 'तत्त्वमसि' या महावाक्यांतही तोच गर्भितार्थ आहे. 'तत्' म्हणजे तुला दिसत असलेलें स्वरूप जें व जितकें आहे तितकाच 'त्वम्' म्हणजे तूं आहेस असा त्याचा साधकांना परमार्थ-निदर्शक अर्थही करता येतो.

## फलश्रुति : आत्मदर्शन व विश्वकल्याण

अशा प्रकारें निरंतर भावयुक्त नामस्मरणाचा अभ्यास चालूं ठेविला असतां देव व भक्त यांतील अंतर कमी होत जाऊन ते एकरूप होतात. आत्मा व ब्रह्म यांच्या ऐक्याचा अनुभव येतो. याचेंच नांव आत्मज्ञान अगर स्वरूप-साक्षात्कार; हाच खरा मोक्ष; हीच पराभक्ति; यामध्यें सर्व वृत्तींचा निरास होऊन परंज्योतिरूप आत्मदर्शनाबरोबर येणाऱ्या आत्मानंदमग्नतेची सहजस्थिति प्राप्त होते. '**अस्मात् शरीरात् समुत्थाय परं ज्योतिः उपसंपद्य स्वेन रूपेण अभिनिष्पद्यते सोऽयमात्मा**' (**मैत्रायण्युपनिषत्**) ; **यत्र चैवा-त्मनाऽत्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति**' (**गीता**) ; '**तदा द्रष्टु: स्वरूपेऽवस्था-नम्** (**पातंजल योगसूत्रें**) ; व '**ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान । पहावें आपणांसि आपण ।**' (**दासबोध**) या वचनांतून, गुरुदेवांच्या मतें पारमार्थिक जीवनाचें परमोच्च ध्येय म्हणजे आत्मदर्शन, याचें यथार्थ स्वरूप स्पष्टपणें पहावयास मिळतें. मात्र हें आत्मदर्शन म्हणजे आपलें 'नुसधें' मुख आपण आरशांत पहाणें नव्हे असा स्पष्ट इशारा ज्ञानदेवांनीं दिला आहे. अनेक भारतीय व पाश्चात्त्य तत्त्वज्ञांना अद्वैत व भक्ति यांच्यामध्यें विरोध दिसून येतो अगर त्यांचा संयोग म्हणजे न उलगडणारें कोडें तरी वाटतें. पण वर उल्लेखिलेल्या

खऱ्याखुऱ्या साक्षात्कारामध्यें या दोहोंचा 'एकवटपणाच' प्रत्ययास येतो. हेंचि ज्ञान हेंचि सीमा। भक्तीचीहि। या परमार्थाच्या गौरीशंकराला पोहोंचावयाचें असेल तर साधकानें स्वतः कितीहि पराकाष्ठेचे प्रयत्न केले तरी सुद्धा अखेरीस 'यमेवैष वृणुते तेनैव लभ्यः' या उपनिषद्-वचनांत म्हटल्याप्रमाणें भगवत्कृपेशिवाय तें शक्य होत नाहीं. ही ईश्वरी कृपा त्रिविध रूप धारण करून भक्ताची 'आळी पुरविते.' प्रथम जिज्ञासु भक्ताला 'सद्बुद्धि' देऊन, नंतर त्याच्या असहाय, भावाकुल स्थितींत 'अनुकंपा' करिते व अखेरीस त्याच्या प्रखर तपस्येनें आकृष्ट होऊन त्याच्यावर आपल्या 'प्रसादा'चा वर्षाव करिते. त्यामुळेच भक्ताचा विभक्तपणा नाहींसा होऊन तो अक्षय शांतिसुखांत निमग्न होतो.

**भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यन्ते सर्वसंशयाः।**
**क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥**

मुंडकोपनिषदांतील वरील श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें साक्षात्कारी पुरुषाचे सर्व मोह नष्ट होतात; सर्व संशयांचा निरास होतो; ईश्वरार्पण बुद्धीनें सर्व कर्में त्याच्या हातून घडत असल्यानें नैष्कर्म्य अंगीं बाणतें. आत्मदर्शनामुळें त्याला नित्य, निरतिशय व अवीट अशा आत्मानंदाची प्राप्ति होते. सर्वाभूतीं समताभाव उत्पन्न होऊन त्याच्या अंगीं भूतदया व विश्वबंधुत्व इत्यादि गुण आपोआप निर्माण होतात. स्वतःचें जीवन कृतार्थ झाल्यानें, समाजाला व अखिल मानवजातीला परमार्थाचा मार्ग दाखवून सुखशांति प्राप्त करून देण्याचें कार्य त्याच्या हातून सहजच घडत असतें. 'जगाच्या कल्याणा' हाच संतांचा स्वभावधर्म होतो. जगांत आजकाल आढळून येणारी अशांतता, वर्गकलह, राष्ट्रांराष्ट्रांमधील स्वार्थमूलक स्पर्धा यांचे दुष्परिणाम टाळावयाचे असल्यास व खरीखुरी समता, विश्वबंधुत्व व 'पंचशीले' वर आधारलेलें शांततामय सहजीवन नांदावयाचें असल्यास तें परमार्थाच्या अढळ व भक्कम पायावरच घडून येईल.'

**तो स्वयें झाला आत्माराम।**
**विश्राम धाम जगाचें ॥**

**'सूर्योदय' पुणें ४**
**रामनवमी शके १८८५**

**न. ग. दामले**

## श्रीसद्गुरु निंबरगी महाराजांची समाधि

नामसुधा सेवुनिया ध्यानीं सदा सुखें डोलावें



दिव्य चक्षुनें आत्मप्रभा सतत पाहुनी

सद्गुरुच्या चरणकमळीं भृंग होउनी

परमार्थमंदिरीं आत्मानंदीं रंगुनी धन्य व्हावें

**सद्गुरु**:– गुप्तरूपाशीं, आतमदेवाशीं, ऐक्य पावलेला महातमा.

**सतसंग**:– सज्जनांचा संग. सद्गुरूंनीं दिलेल्या नामाचें स्मरण, सद्वस्तूचें अनुसंधान हाहि सतसंगच.

**स्वराज्य**:– आत्म्याचें राज्य. तेथेंच खरें स्वातंत्र्य व शाश्वतसुख.

**स्वस्थ**:– 'स्व' रूपीं 'स्थिर' होणें. स्वरूपीं स्थिर झाल्यावर सर्वत्र स्वस्थताच स्वस्थता.

## श्रीसद्‌गुरु भाऊसाहेब महाराज

**नाम विसरूं नये**

दृष्टि चुकूं नये



पुढें काय दिसतें तें

**प्रेमानें वरचेवर पहात जावें**

गुरुकृपेनें मनांत रुजली विशुद्ध निर्गुण भक्ति
विरक्ति जडली निर्धारानें नामस्मरणी अपार प्रीति
अनंत रूपें परमेशाचीं, भाग्यें आली दिव्य प्रतीति
प्रगट जाहली आत्मज्योति, लाधली परम शांति.
देखिला कळस सोनियाचा परमार्थ मंदिराचा
हाचि मार्ग संतांचा, स्वात्मसुखाचा, लोकोद्धाराचा.
देवा, गुरुदेवा, आत्मदेवा, भावें स्मरुनी करी तुझी सेवा
'अभेद-भक्तिचा हर्ष लुटावा' प्रसन्न होउनी ऐसा वर द्यावा.

## श्रीसद्‌गुरु अंबुराव महाराज

विरक्त प्रपंचीं श्वासोच्छ्वासीं घेई नाम सदैव

गुरु तोचि देव, धरी अंतरीं ऐसा दृढ भाव



सुस्वर ऐकुनी दिव्य मुरलीचा प्रकाश पाहुनी चित्सूर्याचा

तन्मय होई निजानंदीं, पाही सोहळा मुक्तीचा

**समाधि** – देवाचें समदर्शन होणें.

**सहजकर्म** – सतत नामाची आठवण ठेवून कर्म करणें.

नेमास बसल्यावेळीं कल्पना आल्या तरी त्यांच्याकडे दुर्लक्ष करून नामाकडे लक्ष ठेवावें म्हणजे कल्पना नाहींशा होतात.

योग्य पदवी प्राप्त होईपर्यंत साधकानें गुप्तपणें साधन करावें. प्रगट करू नये.

एक ‘बिंदु’ जरी दिसला तरी तें देवाचेंच दर्शन समजावें. देव अनंत आहे. त्याचें पूर्ण ज्ञान कसें होईल ?

‘चिदानंदरूप: शिवोऽहं शिवोऽहं’ सारखे म्हणत राहिल्यानें ती स्थिति प्राप्त होत नाहीं. त्याकरतां नि:शब्द नामस्मरणानें ईश्वर-साक्षात्कार व्हावा लागतो.

# गुरुदेव रामभाऊ रानडे

## आत्मसाक्षात्कार–पर्यवसायी

ज्ञान-मूलक, नीति-प्रधान



नामस्मरणात्मक भक्तियोग

**कृपा सद्गुरुची प्राप्ति सबीज नामाची**

प्रेमभरे अखंड नामस्मरणें नाद-बिंदु-कला अनुभवणें
आत्मदर्शनें अद्वय-भजनें परमानंदीं विलीन होणें
परोपकारी देह झिजवुनी जीवन सार्थक करणें.

**सत्संगः**– पारमार्थिक सहजीवन. या सहजीवनास साधक आपल्या योग्यतेप्रमाणें हातभार लावतो व गरजेप्रमाणें त्यापासून लाभ करून घेतो.

**साधकाची कसोटीः**– परमार्थाची ओढ, सद्गुरूवरील निष्ठा, नामस्मरणाकडे दिलेला काळ व त्यांत वाटणाऱ्या आनंदाचें प्रमाण.

**मुक्तिः**–परमेश्वराच्या वैभवांत, सामर्थ्यांत, ज्ञानांत व आनंदांत सहभागी होणें.

# श्रीसद्‌गुरु भाऊसाहेब महाराज यांचें बोधवचनामृत

१. गुरु हा घाली ज्ञानांजन । गुरु हा दाखवी निजधन ।।
२. ज्ञान म्हणजे आत्मज्ञान । पाहावें आपणांसी आपण ।।
३. ज्ञानास मूळ अग्नि । भक्तीस मूळ विरक्ति ।।
४. आठव तो ब्रह्म । नाठव तो भवभ्रम ।।
५. नाम पावन पावन । याहुनि पवित्र आहे कोण ।।
६. नामाच्या चिंतनें । बारा वाटां पळतीं विघ्नें ।।
७. हाकारोनी सांगे तुका । नाम घेतां राहो नका ।।
८. तिळाएवढें बांधुनि घर । आंत राहे विश्वंभर ।।
९. नामरूप जडलें चित्तीं । दे मज तयांची संगति ।।
१०. सकळ धर्मांमध्ये धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म ।।

---

कोणी सूर्य उभा केला किंवा भूतभविष्य सांगितलें तरी त्या ठिकाणीं खरें ज्ञान आहे असें म्हणूं नका. तो ठकमार्ग. समर्थांच्या कृपेनें आजवर चाललेला आत्मज्ञानाचा मार्ग हाच खरा.

शब्दज्ञान शिकून 'ज्ञानी जाहलों' अशा अंहकारानें परमार्थाचा घात होतो.

आंत विषयांचें चिंतन, बाहेर मात्र आत्मध्यानाचा देखावा. कूटस्थांत आळस, वीट, कंटाळा असून वरकरणीं भक्तीचें सोंग. या दंभामुळें, कृत्रिमपणानें प्राणी करंटपणा भोगतो. आपला आपणच वैरी होतो.

परद्रव्य व परस्त्री यांपासून निष्ठुरतेनें दूर असावें. हीं दोन दु:खभोग आणतात.

उपाधि मुळीं नासकी. परंतु त्यावीण भक्ति वाढत नाहीं. भक्ति वाढण्यासाठीं उपाधि, पोट भरण्याकरतां, जीवभाव मिरविण्याकरतां नव्हे. उपाधीस कंटाळूं नये पण उपाधींत सांपडूं नये. भक्तीचा थाट वाढावा या एकाच हेतूनें नामसप्ताह, उत्सव वगैरे करावेत.

निष्काम भक्तीची प्रीति असावी. अपरोक्ष ज्ञानाचा निदिध्यास लागावा. म्हणजे देव भक्ताच्या सर्व इच्छा पुरवितो.

कोणापुढेंहि आपण हात खालीं करूं नये.

अपरोक्ष ज्ञान म्हणजे आपोआप जिकडे पहावें तिकडे अवघें ब्रह्मरूप अक्षापुढें.

मन बलवत्तर करून, सर्व इंद्रियें नेमाकडे लावून, गुरुकृपेनें मिळालेल्या नामाचा कट्टानें अभ्यास करावा.

मनाच्या ओढीनें प्राणी विषयासक्त होतो. मुळीं मनच हातीं आलें नाहीं तर सद्गुरु काय करील ? 'आधीं मन मुंडा मन मुंडा। मग परब्रह्म धुंडा ॥' विषयदास झाला तो भक्तराज केवि होई ?

जीवास कांहीं तरी अटक घातली पाहिजे म्हणजे आठवण राहते. दररोज तीन वेळां कट्टानें, नेमानें मागील उजळणी, पुढें पाठ असें स्मरण करावें.

जोंपर्यंत दुःखसंपर्क झाला नाहीं तोंपर्यंत आनंदानें, नेमानें नामस्मरण करावें म्हणजे दुःख आल्यास, मनास दुःख होत नाहीं.

प्रपंचांत कोणी एकदम श्रीमंत होत नाहीं किंवा विद्वान् होत नाहीं; त्याकरतां ध्यास व अभ्यास पाहिजे. तसेंच परमार्थांतहि आत्मज्ञान होण्यास गुरुप्रज्ञेवर माया ठेवून, दीर्घकाल, कष्ट सोसून अभ्यास करायला हवा. येथे तांतडी चालत नाहीं.

डोळ्यांत झोपेची गुंगी नसावी. अंतःकरणांत हर्ष असावा निष्ठेनें, निश्चयानें स्मरणाचा अभ्यास करावा म्हणजे तूक कळूं लागते. नंतर उत्सुकता व प्रेम वाढून, देहभाव जाऊन, भक्तीमध्यें मन रंगून जातें. तें आत्मसुख सांगतां, लिहितां येत नाहीं.

जितकें होईल तितकें, ज्या वेळीं फावेल त्या वेळीं स्मरण करीत जावें. जातां येतां, खातां पितां, बसतां लिहितां, दृष्टि, नाम आठवणींत आणून उद्योग करीत जावा. आठवण असली म्हणजे झालें. समर्थ-कृपेनें सर्व शुभ होतें.

जे जे प्रसंगीं कांहीं अडचण पडेल त्या प्रसंगीं देवाचें नामस्मरण करून कार्य करावें; पण मी कर्ता हा भ्रम नसावा.

" दिवसेंदिवस अधिकच प्रीति " या नांव चढती वाढती भक्ति. निद्रा किंचित् न लागे रात्रीं, करितों एकांतीं हरिभजन-स्मरण.

भक्ताला देव सर्वथा साहाय्यभूत आहे हें समजून तोच देव आपल्याहि अंतःकरणांत आहे याचें स्मरण ठेवून आनंद मानावा.

✓ कूटस्थांत देहभाव न बाळगतां खऱ्या निष्ठेनें देवावर सर्व भार घालून जे निरंतर भक्ति करितात त्यांना देव कधींहि अंतर देत नाहीं. अशा भक्तांना देवपदवीच प्राप्त होते.

गुरुकृपा होऊनहि जो आळसानें विषयांच्या ओढीमुळें साधन टाळतो व डोळ्यांपुढे प्रकाश करून घेत नाही तो धृतराष्ट्र म्हणजे अंधळा.

अंतःकरणांतील ' वि ' कार दूर करून नीतिन्यायानें वागतो तो विदुर.

' मी, माझें ' ही आठवण ज्याच्या अंतःकरणांतून पार नाहींशी झाली आहे तो संन्यासी. संन्यासी म्हणजे षडन्यासी. ज्यानें षड्-रिपूंचा त्याग केला आहे तो.

प्रवृत्तींत अगर निवृत्तींत 'मी, माझें' सर्व अंतःकरणापासून विसरून गेलें पाहिजे म्हणजे निजवस्तूची भेट होते.

चिरंजीव म्हणजे चिरकाल जो जीवभाव आहे तो शिवभाव होऊन गेला म्हणजे झालें. 'बिंदु तीर्थरूप' झाला म्हणजे झालें. याप्रमाणें होण्यास नामदृष्टि खिळून गेली पाहिजे. दृष्टींत दृष्टि जडून गेली पाहिजे.

परद्रव्य, परस्त्री यांचा अभिलाष न करतां जो 'परवस्तूचें' ठिकाणीं निर्धारानें लक्ष ठेवून भगवत्स्वरूपांत मिळून जातो तो विष्णुदास.

निर्गुणाचा सगुणांत अवतार होतो. सगुण भजनानें निर्गुण वस्तूची भेट होते. दर्शन, स्पर्शन, संभाषणाचा अनुभव येतो. रुक्मांगद, महिपती, ज्ञानदेव, तुकाराम, रामदास वगैरे अनेक पुण्यवंतांना पूर्वीच्या काळीं असा अनुभव आला होता. आजहि असे अनुभवी संत आहेत.

गुरुशिष्ययांची गोष्ट अशी आहे कीं, शिष्याला गुरूचा सदा निदिध्यास लागला म्हणजे गुरु सदा आपल्याजवळ आहे हें शिष्याला समजतें. सद्‌गुरुस्मरणानें असलें म्हणजे तीच पदवी मिळते.

सद्‌गुरूच्या आज्ञेप्रमाणें नामस्मरण केलें असतां प्रारब्धाचा नाश होतो. विधात्याची रेखा पुसली जाते व दुःख नष्ट होऊन आनंद होतो. त्या आनंदामुळें लोभ व क्षोभ दोन्हीं नष्ट होतात.

सारांश, नामस्मरण निष्ठेनें, कट्टानें चालवावें म्हणजे पुण्याचा ठेवा, ठेवा होत जातो .... डोळ्यांपुढें ज्ञानप्रकाश होतो ... वस्तु दिसूं लागते ... सर्व निर्विघ्न होतें ... प्रपंचांत व परमार्थांत आनंद आनंद होतो.

# श्रीसद्गुरुनाथ निंबरगी महाराज यांचीं पदें

## १

(राग जयजयवंती, ताल त्रिताल)

गुरुचरणकमलदल्लि भृंगनागो नी ॥ प. ॥
स्थिरविल्ल संसार नरजन्मदोळु बंदु ॥
परतत्व तिळिदु साधुर संगियागो नी ॥ १
मौन हिडिदु मुद्रे बलिदु ज्ञानज्योतियोळगे नलिदु ॥
स्वानुभवामृतव सविदु निस्संगनागो नी ॥ २
मुप्पिन मुनिय पिडिदु वचन कप्पुगोरळ काडसिद्ध ॥
निट्टेडेगे होगि साष्टांगनागो नी ॥ ३

## २

(राग दरबारी, ताल दीपचंदी)

ॐ नाम कायुवदु नामद बलवु ॥ प. ॥
प्रल्हादन काय्दंथ पावन नाम ।
अजामिळगे बल अच्युत नाम ॥
सुररन्नु संतोषबडिसिद नाम ।
द्रौपदियभिमान काय्दंथ नाम ॥ १

पक्षिय पुत्रन रक्षिसिद दाम ।
पार्थन पंथव गेलिसिद नाम ॥
पराशरादिगळिगे ओदगिद नाम ।
पन्नगशयनन परिपूर्ण नाम ॥ २

करिराजन काय्दंथ करुणद नाम ।
कंदन ककुलाति केळिद नाम ॥
भवद बंधन बिडिसिद नाम ।
गुरुलिंगजंगम घन पुण्य नाम ॥ ३

३

(राग भूप, ताल दीपचंदी)

नेयिसि नुडिदन्याके । श्री बलभीमा ॥ प. ॥

नोयिसि नुडिदनु दोष माडिदेनेनु ।
क्लेश हरिसो एन्न भासि पालिप देवा ॥ अ. प. ॥

दासन दास नानु । केशव स्वामी ।
करुणदि कायो एन्न ॥
एनू इल्लदे याके एन्न शब्दशस्त्रदिंद होडेद ।
सोसि न्यायव माडो वासुदेवा नीनु ॥ १

कल्लनु मरेगोंडेया । करुणाकरा ।
जीवद एल्लिटेया ॥
अल्लमप्रभु निथ्म सन्निधविरुवेनु ।
कल्लु ओडेदु नरसिंह कडेगे बारो ॥ २

धरेयोळु धन्यवाद । निंबरगि ग्राम ।
वासुळ्ळ भीमा नीनु ॥
गुरुलिंगजंगम चिन्मय रूपने ।
तनु मन धत निम्म चरणकोप्पितो देवा ॥ ३

४

लावणी

केळु चातुरा हक्की भेद केळतिद्दि नमग ।
हक्की ब्याटगार हेसर हेळतेनु तिळियो मनसिन्याग॥प.॥
मोदलु नारद फाशि ओगेदनो हक्किय तलि म्याग ।
शुक महाराज नुंगि कूतनो धीर एष्टु अवग ॥
गुरु दत्तात्रय ओत्ति हिडिदनो तन्न कै ओळग ।
एंटु आरु बरदले इब्बर तुळिदरो हक्कीगे ॥
भीष्माचार्यनु मुजर इट्टनो धनु बाण कैयाग ।
वीर मारुति दूर ओगेदनो ब्रह्मांडाचीके ॥ १

हक्कि हस्तु ब्रह्मांड नुंगितो ओणगि अठरा वनस्पतीदु ।
पाखंडल्ल परमेश्वर साक्षि हाव ई मातिदु ॥
नन्न नुंगितो निन्न नुंगितो ह्यांग हेळु ईग ।
उप्प नुंगितो तूंतुणि नुंगितो तुराइ घळिग्याग ॥
गुरुलिंगजंगम दयासागर हार बेन्न म्याग ।
एंदेंदू परनिंदेयाडबेड पाप पदराग ॥ २

## ५

### लावणी

केळु शायिरा हिंडियो खून ई यिक अद नोडु एंथादु ।
एंटु मारि एळु कोडु नम्म निम्म पैलिसदाचीदु ॥ प. ॥
केळु शायिरा मातिन तर्क नेनय बंदित्तो मत्तोंदु ।
साविर भेद सास्वि काळद वेंड ओडदितो गोदीदु ॥
सप्त धातुगळु मूरु मूरिंद्रिय मत्तोंदिद्रिय हेंच्चिदु ।
ऐवत्तारु पक्क बिच्चि कुगुतद बल गर्दोदु ॥
टोंकिन ओळग उडदार होळूतद एणिसिकोरो एळ एळीदु ।
उडदारदोळग ओब्ब ऋषि कूतानो खून हेळतेनु अवंदु ॥ १
मिकद ब्याटिगे मुंद होंटरो नाकु मंदि वालीकार ।
नाकु मंदिगे कुमकनादरो हदिनेंटु मंदि वीर जोर ॥
काळजदोळग गाण नट्टितो अठरा पद्मद आकार ।
तलि हारि भूमिगे बिद्दितो भूमि नडगितो थरथर ॥
धन्य निंबरगी दोड्ड क्षेत्र आदिनारायण अवतार ।
गुरुलिंगजंगम सर्वेशा ता निर्बैलादो आकार ॥ २

## ६

(राग आनंदभैरवी, ताल दीपचंदी)

ईसु दिन ई नाल्कु वेद ।
ब्यारे ब्यारे भाविसुतद्दे ॥ प. ॥
सद्गुरुवरदरिंद तिळिदु ।
सकल शास्त्रगळु ओंदेंबुतिद्दे ॥ १

गिरिजे गंगा रुद्र हरिगळ ।
    व्रतगळ ब्यारे माडुतलिद्दे ॥
सार्वभौमरिंदे तिळिदु ।
    सकल व्रतगळु नानागिद्दे ॥ २
सप्त स्वर्ग उर्वि पाताळ ।
    सुरचरगण ब्यारे तोरुतलिद्दे ॥
सर्वशांतरिंद्रे तिळिदु ।
    गुरुलिंगजंगम नानागिद्दे ॥ ३

७

(राग आनंदभैरवी, ताल दीपचंदी)

मनसिन मुरगिय तिद्दिसो देवा ॥ प. ॥
प्रातःकालके एद्दु परद्रव्य अपहार ।
    साधुर निंदेयनाडुवदु ॥
साधिसि यमनवरु एळेदोय्युवाग ।
    सत्ते सत्तेनंत मरगुतल्याद ॥ १
यतिवेषव ताळि देशभ्रष्टनागि ।
    काशिय क्षेत्रक्के होंटितु मनसु ॥
काशिय दारियोळु वेशिगे मेच्चिच ।
    केशव निम्मनु मरेयितु मनसु ॥ २
बल्लवगे आर्जव माडुतल्याद ।
    बडवरिगे नोयिसि नुडियुतल्याद ॥
गुरुलिंगजंगमचरणव नंबदे ।
    अडवियल्लि चरिस्याडुतल्याद ॥ ३

८

(राग कांबोधि, ताल झपताल)

एनु माडिदि केळेन्न ! देवा ! ॥ प. ॥

एनु माडिदि एंतेंत हेळलि ।
हितवु एल्ल निन्नल्लिरलु ॥
घन घातकतर्नांददलि ।
एन्न नी केडिसिदि, सांबा ॥ १

एन्नोळु नीनु कूडि आडिदि ।
आडुत बंदु फ़ासि हाकिदि ॥
फासिय जरिदु जारि निंतिदि ।
इदु अल्ला रीति, सांबा ॥ २

खुळ्ळ देहदोळु गुळ्ळागि मेरेदि ।
दुःख के एन्न गुरि माडिदि ॥
भिन्नविल्लदलि भिन्न माडिदि ।
भुलविगे मरुळादि, सांबा ॥ ३

फासियोळगे एन्न घासि माडुवदे ?
ईसु काल निन्न दयदल्लिद्दे ॥
हरुषदिद शिव सद्गुरु एंदे ।
भवद फासि नी हारिसिदि, सांबा ॥ ४

जीव शिव एंब भेद निन्नल्ले ।
ई संबंधव नडिदु नोडले ॥
ठकवाठकवि हुच्च ब्याडेले ।
हुच्चा नी केळो, सांबा ॥ ५

जीवद इच्छिले आगुवदिल्ल ।
शिवन इच्छे नडिसुवदेल्ले ॥
गुरुलिंगजंगमन पादक होंदि ।
दोषव कळकोळ्ळो, सांबा ॥ ६

९

(राग काफी, ताल केरवा)

चित्याक माडती शिवने इट्टानेळु प्राणी ॥ प. ॥
उदकदलि उत्पत्ति माडुवऱ्यारु ।
होट्यान शिशुवनु सलहुवऱ्यारु ।
साकि निन्न जोके माडिदवने इट्टानेळु प्राणी ॥ १
हिंदे निन्न सलहिदऱ्यारु ।
मुंदे निन्न कोलुवऱ्यारु ।
अंदिगिंदिगेंदिगादरू शिवने इट्टानेळु प्राणी ॥ २
अंतरदि अंबर इट्टुवऱ्यारु ।
रवि शशि मार्गव नडिसुवऱ्यारु ।
गुरुलिंगजंगम सर्वेशा ता शिवने इट्टानेळु प्राणी ॥ ३

१०

(राग पुरियाधनाश्री, ताल दीपचंदी)

कल्लु मेत्तगे माडिकोळ्ळण्णा । बल्लवन केळि ॥ प. ॥
कल्लु मेत्तगे माडिकोळ्ळो । कल्लु सक्करेगित सवियो ।
सार अमृत सुरिदु नीनु । ज्ञानज्योति तुंबिकोळ्ळो ॥अ. प. ॥
कल्लिनोळगे परुष काणण्ण । परब्रह्म नरियदे ।
कैय ओळगे बंदीतु ह्यांगण्णा ॥
कल्लुकुट्टिग अल्लमप्रभु । शिलेय ओडेदु सेलेय तेगेद ।
नीरु नीरु कूडिद बळिक । भेदभाव गळचाक बेकु ॥ १

कल्लु कल्पवृक्ष काणण्ण । बेडिद फलगळ ।
ಕೊಡುವ ब्रीद उंटु नोडण्ण ।।
गुरुलिंगजंगमचरण । होंदिगुडो एंदिगगलदे ।
बेल्ल सवियु कूडिदंते । कूडिकोळ्ळो नीनु इल्ले ।। २

११

(राग भूप, ताल दीपचंदी)

ना ह्यांग बडव ना ह्यांग परदेशि ।
नी एन्न सरियविरलु ।। प. ।।
निनगे क्षयविल्ल एनगे भयविल्ल ।
भप्परे एन्नोडेय निजरूप नीनु ।। अ. प. ।।
ओडहुट्टिदव नीनु ओडलिगे हाकुवे नीनु ।
हडेद तायि तंदे वळग नीनु ।।
इंतप्प दोरे नीनु एनगे इरुतिरलागि ।
बेडिद्दु दोरकुवदु आश्चर्यवेनु ।। १
मुंदे नोडलु नीनु हिंदे नोडलु नीनु ।
एडबल काय्वंथ कर्ता नीनु ।।
गुरुलिंगजंगमन गुरुतु कंडवरिगे।
गुणवंतरिवरेल्ल माडुवरेनु ।। २

## १२

(राग भूप, ताल दीपचंदी)

नेल्लु कुट्टुणु बारम्मा । इब्बरु कूडि ॥ प. ॥

नेल्लु फुट्टुणु वारे निल्लदे बेन्नु हत्ति ।
हन्नेरडु हदिनारु नल्लेयरु कूडिकोंडु ॥ अ. प. ॥

तनुवेंब ओळ्ळ माडि । प्रणववेंब ।
ओतकीले हेरि हाकि ॥
विवेकवेंब अविक हसन माडि ।
हळ्ळ तगियम्मा ज्ञानदृष्टिले नोडि ॥ १

वासनत्रयगळेंब । ओलेगुंडु माडि ।
प्रारब्ध गडिगे हेरि ॥
काम क्रोधवेंब कट्टिगे उरि मांडि ।
प्रपंच परमार्थ ओळहोरगे नोडि ॥ २

कुदियुवे समयदल्लि । मदद उक्कु ।
मीरि बरुतलदम्मा ॥
सत्य धीर एंब हुट्टिले होडेदु ।
नेट्टगे अडिगेय धिट्टागि माडम्मा ॥ ३

परमान्न पायसवु । प्रारब्धदि ।
प्राप्तवादीतु एळम्मा ॥
गुरुलिंगजंगम बीगर कूडिकोंडु ।
स्वानंद एडि माडि सविय नोडम्मा ॥ ४

## १३

(राग भैरव, ताल दीपचंदीं)

अंदिल्ल स्वामि इंदिल्ल ।। प. ।।
एंदिगादरू निम्मनगलि ना इल्ल ।। अ. प. ।।
निर्बैल नीनु निर्विकारनु नानु ।
सगुण रूप नीनु शरणु माडुवे नानु ।। १
पंचवदन नीनु पाद नंबिदे नानु !
जगभरित नीनु जगद ओळगे नानु ।। २
प्रणमस्वरूप नीनु पडिसि नोडुवे नानु ।
गुरुलिंगजंगम नीने नानू नीने ।। ३

# परमार्थमंदिर

## अनुभव-पदें

### १

अ एंब वर्ण ऐश्वर्यवं वर्धिपुदु ।
ल एंब वर्ण लकुलेश घनपदमक्कु ।
म एंब वर्ण मायाब्धियनु दाटिपुदु प्र एंब वर्ण सतत ॥
कायद गुणंगळं कत्तरिसि विसुटिपुदु ।
भु एंब वर्ण भूतेश्वरन काणिपुदु ।
ओय्यारदिं नंबि अल्लमप्रभु एंब मंत्रवनु जपिसुतिहुदु ॥१

### २

(राग पहाडी, ताल केरवा)

अवक्तंगेरु नावु, अक्करतीले होगि,
होक्कु नोडुनु रामतीर्थ ।
हुट्टि बंददक इदु ओंदु सार्थ ॥ प. ॥
मूरु गुंडु हूडि, नीरु हंडेक हाकि,
सर्वरु माडूणु जळक ।
दुर्गुण कटिगिय, मुरिदु ओल्याग हाकि,
उरिदु माडूणु एल्ल पाक ।
नरदेह तोळकोंडु, निर्मलरागूणु,
जरद सेल्लेयनुट्टु, चोक्क ॥

परमध्यानद कंचुकव तोट्टु,
हरन विभूति फणियल्लि कुंकमवट्टु।
पूर्ण नासिक कोनेयलि मूगुतिट्टु,
मिक्काद डागिन, लेक्किल्लदे इट्टुकोंडु ।
कूडि होगूणु इब्बरु जत्त ।। १
हेच्चिन सखियरु, अच्चमुत्तैदेयरु,
पंचतत्त्वदारुति ।
स्वच्छागि तुंबूणु, संचितेण्णिय हाकि,
चाचि इडापिंगळ बत्ति ।
हच्चूणु एडबल, बिच्चि बेळगुवंथ,
कच्च सूर्यचंद्रज्योति ।।
उच्च रत्न कळस नडुमध्यदल्लि, सुचित्त सखियर हस्तदल्लि।
निश्चित्यागि होगूणु सालिमेलि ।
दिक्कु देशवनेल्ल, होक्कु नोडूणव्वा,
आरु नेलियनेरि िंगतु ।। २
ओंबत्तु बागिल, तोंभत्तारु अंगुल,
कोंबु कोणेयोळु बेळग ।
इंबाद गुडियोळु, तुंबि सूसलाडू,
संबळ ताळ मृदंग ।
अंबरदोळु निरालंबन सेवेगे,
बिबिसि आगुणु बेरग ।।
नबि सर्वरु आरुतियन्नु पिडिदु,
शंभु कर्पुर बेळगि नम्म कायि ओडेदु ।
रंभेरेल जीवन्मुक्तियन्नु पडेदु,
देशदोळगधिक रामेश्वर कूडि होगूण बारदत्त ।।३

३

(राग पहाडी, ताल केरवा)

अगडबंबं बंबं बाजे डमरू बाजे डमरू ।
नाजे सदाशिव आदिगुरु ॥ टे. ॥
नाचे ब्रह्मा नाचे विष्णु नाचे महादेव ।
जागे पार्वती नाचे सब देव ॥ १
भांग खाए जहर खाए कालिया धतूर ।
जोगिनी के पीछे पीछे नंगे अवधूत ॥ २
काशी विश्वनाथ जाको नाम विराजे ।
आगे भैरव पाछे हनुमान साजे ॥ ३

४

(राग भैरवी, ताल केरवा)

अगर है शौक मिलनेका,
तो हर दम लौ लगाता जा ॥ टे. ॥
जला कर खुद नुमाई को
भसम तन पर लगाता जा ॥ १
मुसल्लह फाड़ तसबी तोड़
किताबें डाल पानी में ।
पकड दस्त तू फ़िरिश्तों का
गुलाम उनका कहाता जा ॥ २
न मर भूखा न रख रोज़ा
न जा मसजिद न कर सिजदा ।
हुकुम है शाह कलन्दरका
अनलहक़ तू कहाता जा ॥ ३

कहै मन्सूर मस्ताना
हक़ मैंने दिल में पहचाना।
वही मस्तों का मैखाना
उसी के बीच आता जा ॥ ४

५

(राग भीमपलास, ताल त्रिताल)

अजर अमर इक नाम है
सुमिरन जो आवै ॥ टे. ॥
बिन ही मुख के जप करो
नहिं जीभ डुलावो।
उलटि सुरत ऊपर करो
नैनन दरसावो ॥ १
जाय हंस पच्छिम दिसा,
खिरकी खुलवावो
तिरबेनी के घाट पर
हंसा नहवावो ॥ २
पानी पवनकी गम नहीं
वो ही लोक मँजावो।
ताही बिच इक रूप है
वो ही ध्यान लगावो ॥ ३
जिमी असमान वहाँ नहीं
वो अजर कहाव।
कहै कबीर सोइ साध जन
वा लोक मँझावै ॥ ४

## ६

(राग पुरिया धनाश्री, ताल दीपचंदी)

अनुगालवु चिंतेयु मनुजरिगे ।
मन होगि माधवन ओडगूडु तनक ॥ प. ॥
सतियु इद्दरु चिंते इल्लदिद्दरु चिंते ।
मतिहीने सतियादरे चिंतेयु ॥
पृथिवियोळगे सति अति चलुवे आदरू ।
मिति मीरि नडेदरे अवळोंदु चिंते ॥ १
मक्कळिद्दरु चिंते हल्लदिद्दरु चिंते ।
अत्तु अन्नके काडुव चिंतेयु ॥
तुत्तिगे सालदेंब बडतनद ।
कक्कुलते देशदोळिल्लद चिंते ॥ २
बळगविल्लद चिंते बळगवादरु चिंते ।
मेले संबळ बारद चिंतेयु ॥
साल कोडो चिंते साल तगेयो चिंते ।
भूलोकदोळगेल्ल चिंते काणण्णा ॥ ३
मनेय इल्लद चिंते मनेयादरू चिंते ।
मनेयु वार्तेयु नडेयद चिंतेयु ॥
तोंडनागि पोत्तु तिरुगुव चिंते भू- ।
मंडलदोळगेल्ल चिंते काणण्णा ॥ ४
बडवनादरु चिंते बल्लिदनादरु चिंते ।
कोड होन्नु मनेयोळिद्दरु चिंतेयु ॥
पोडवियोळगे नम्मन पुरंदरविठ्ठल ।
बिडदे चिंतिसिदरे चिंते निश्चिंते ॥ ५

७

(राग पहाडी, ताल केरवा

अनंत जुगाचा देव्हारा । निजबोधाचा घुमारा ।
अवचिता भरला वारा । या मल्लारीदेवाचा ॥ १
शुद्ध सत्वाचा कवडा मोठा । बोधबिरडें बांधला गांठा ।
गळां वैराग्याचा पट्टा । वाटा दावूं भक्तीच्या ॥ २
हृदयकोटंबा सांगातें । घोळ वाजवूं अनुहातें ।
ज्ञानभंडाऱ्याचें पोतें । रितें नव्हें कल्पांतीं ॥ ३
लक्षचौऱ्याशीं घरें चारीं । या जन्माची केली वारी ॥
प्रसन्न झाला देव मल्लारी । सोहंभावीं राहिलों ॥ ४
या देवाचें भरतां वारें । अगी प्रेमाचें फेंपरें ।
गुरुगुरु करी वेडे चारें । पाहा तुकें भुंकविलें ॥ ५

८

(राग तिलंग, ताल त्रिताल)

अपने घट दियना बारु रे ॥ टे. ॥
नाम कै तेल सुरत कै बाती,
ब्रह्म अगिन उदगारु रे ॥ १
जगमग जोत निहार मन्दिरमें
तन मन धन सब वारु रे ॥ २
झूठी जान जगतकी आसा,
बारंबार बिसारु रे ॥ ३ ॥
कहै कबीर सुनो भाइ साधो
आपन काज सँवारु रे ॥ ४

९

(राग मालकंस, ताल त्रिताल)

अब की राखि लेहु भगवान ॥ टे. ॥
हम अनाथ बैठी द्रुम डरिया
पारधि साध्यौ बान ॥ १
ताके डर निकसन चाहत हौं
ऊपर रह्यो सचान ॥
दोउ भाँति दुख भयो कृपानिधि
कौन उबारै प्रान ॥ २
सुमिरत ही अहि डस्यो पारधी
लाग्यौ तीर सचान ॥
सूरदास गुन कहँ लग बरनौं
जै जै कृपानिधान ॥ ३

१०

(राग जयजयवंती, ताल त्रिताल)

अब कैसे छूटे नाम रट लागी ॥ टे. ॥
प्रभुजी तुम चन्दन हम पानी
जाके अँग अँग बास समानी ॥ १
प्रभुजी तुम घन हम बन मोरा
जैसे चितवत चन्द चकोरा ॥ २
प्रभुजी तुम दीपक हम बाती
जाकी जोति बरै दिन राती ॥ ३

प्रभुजी तुम मोती हम धागा
जैसे सोनहि मिलत सुहागा ॥ ४
प्रभुजी तुम स्वामी हम दासा
ऐसीभ गति करै रैदासा ॥ ५

## ११

(राग पिलू, ताल केरवा)

अब तुम कब सुमिरोगे राम ॥ टे. ॥
गर्भवास में जप तप साधन, बाहर निकले बेइमान॥ १
बालकपन में खेल गवाँया, तरुणपन में काम ॥ २
बूढ़े होकर काँपन लागे, निकल गया अवसान ॥ ३
झूठी काया झूठी माया, आखिर मौत निदान ॥ ४
कहत कबीरा सुनो भाइ साधो यही घोड़ा मैदान ॥ ५

## १२

(राग काफी, ताल त्रिताल)

अब तो प्रगट भई जग जानी ॥ टे, ॥
वा मोहन से प्रीति निरन्तर
क्यों हि रहेगी छानी ॥ १
कहा करूँ सुन्दर मूरति इन
नयनन माँझ समानी ॥ २
निकसत नाहिं बहुत पचिहारी
रोम रोम उरझानी ॥ ३
अब कैसे कहूँ रि जात है
मिलो दुधसे पानी ॥ ४

सूरदास प्रभु अन्तर्यामी
सब के मन के स्वामी ।। ५

१३

(राग पहाडी, ताल केरवा)

अब मैं नाच्यों बहुत गुपाल ।। टे. ।।
कामक्रोध को पहिरि चोलना । कण्ठ विषय की माल ।। १
महामोह के नूपुर बाजत । निन्दाशब्द रसाल ।
भरम भऱ्यो मन भयो पखावज । चलत कुसंगत चाल ।। २
तृस्नानाद करत घट भीतर । नाना विधि दै ताल ।
माया को कटि फेंटा बाँध्यो । लोभ तिलक दै भाल ।। ३
कोटि कला काँछि देखराई । जल थल सुधि नहिं काल ।
सूरदास की सबै अविद्या । दूर करौ नँदलाल ।। ४

१४

अब रहीम मुश्किल पडी
गाढे दोऊ काम ।
साँचे से तो जग नहीं
झूटे मिलै न राम ।। १
चींटी चावल ले चली
बीच में मिल गई दाल ।
कह कबीर दोना मिले
इक ले दूजी डाल ।। २

कदली सीप भुजङ्ग मुख
 स्वाति एक गुण तीन ।
जैसी सङ्गति होयगी
 तैसोई फल दीन ॥ ३

जो रहीम उत्तम प्रकृति
 का करि सकति कुसंग ।
चन्दन विष व्यापत नहीं
 लपटे रहत भुजंग ॥ ४

कबिरा तेरी झोंपडी
 गलकट्टन के पास ।
जो करता सो पावता
 तू क्या करै उदास ॥ ५

बुरा जो देखन कु चला
 बुरा न देखा कोय ।
जो दिल देखूँ आपना
 हम अस बुरा न होय ॥ ६

विधिने यह हिय जानि के
 होष न दीन्हो कान ।
धरा मेरु सब डोलते
 तानसेन की तान ॥ ७

गाया है बूझा नहीं
 गया न मनका मोह ।
पारस तक पहुँचा नहीं
 रहा लोह का लोह ॥ ८

जो रहीम मन हाथ है
तो तन कहुँ कित जाहि ।
जल में जो छाया परै
काया भीजति नाहिं ॥ ९
मन गया तो जाने दो
मत जाने दो सरीर ।
ना खेंचे कमान तो
कहँ जायेगा तीर ॥ १०

## १५

(राग पहाडी, ताल केरवा)

अमोलिक रत्न जोडलें रे तुज ।
कां रे ब्रह्मबीज नोळखसो ॥ १
न बुडे न कळे न भिये चोरा ।
ते वस्तु चतुरा सेविजेसु ॥ २
ज्ञानदेवो म्हणे अविनाश जोडलें ।
आणूनि ठेविलें गुरुमुखीं ॥ ३

## १६

### वचन

अय्या, पाताळवित्तित्त श्रीपादवत्तत्त
ब्रह्मांडवित्तित्त मणिमुकुटवत्तत्त
अय्या दश दिक्कु इत्तित्त दश भुजगळत्तत्त .
चन्नमल्लिकार्जुनय्य नीनेन्न करस्थलवके बंदु चुळुकादिरय्य

## १७

(राग पुरिया धनाश्री, ताल दीपचंदी)

अरविंनिद स्त्रोत्र माडुवे । गुरुमूळपीठ ।
अरविंनिद स्तोत्र माडुवे ॥ प० ॥
अरविंनिद स्तोत्र माडुवे । शिरव बागि वरव बेडुवे ।
कुरुहु कोट्टनो गुरुराय । ब्रह्मादि लोल्याडु एंदु ॥ अ. प. ॥
मोदलु रेवणसिद्ध जनिसिद । आडलिक्के ।
रेणागिरियनेरि क्रीडे माडिद ॥
एरि क्रीडेयन्नु माडि । पोक्कु मुक्तिमंदिरदोळु ।
मरुळसिद्धरूप ताळि । मोगलायिंद बंद प्रभु ॥ १
तृतिय काडसिद्धरायनु । अति वेगदिंद ।
सिद्धगिरियनेरि निंतनु ॥
सिद्धगिरिय कोळ्ळदल्लि । साधिसि ता ऐक्यनागि ।
नारायणरूप ताळि । निंबरगियल्लि प्रगटनाद ॥ २
अवर कंद बंद तिरुगुत । रघुनाथप्रिय ।
साधु एंदु बिरुद सारुत ॥
चिम्मड पवित्र स्थान नोडि । अल्लि वस्ति माडिद राम ।
तत्तनिरंजनदि बंदु दास नागि मेरदेनल्ले ॥ ३

## १८

(राग आनंदभैरवि ताल केरवा)

अरितु गुरुविन पाद हुडुकि होंदु मुक्तियिंदु ।
मरेत गुरुविन संग केडु इंदु नरक मुंदु ॥ प. ॥
ओळ्ळे नाविनोळु कल्लु हाकिसुवदु अदु दाटिसुवदु ।
कल्लिगे कल्लु कट्टिदरल्ले मुळुगुवदु अदु मुंदके होगदु ॥ १

